नक्षलवाद्यांना अटक करण्यासाठी त्यांच्याबाबत माहिती देणाऱ्या व्यक्तींना देण्यात येणारी रोख रक्कम मंजूर करण्याचे अधिकार प्रदान करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्रमांक- एनएएक्स- ०१२०/प्र.क्र. ०६/विशा-१ ब**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

दिनांक- ०८ मे, २०२०.

**वाचा-**

१. शासन निर्णय, गृह विभाग क्र.- एनएएक्स- २००५/प्र.क्र.२२/विशा-१ब, दि. २४/११/२००६.

२. शासन निर्णय, गृह विभाग क्र.- एनएएक्स- ०४१४/प्र.क्र.९२/विशा-१ब, दि. ८/८/२०१४.

३. शासन शुध्दीपत्रक, गृह विभाग क्र.- एनएएक्स- ०४१४/प्र.क्र.९२/विशा-१ब, दि. १३/२/२०१५.

४. अपर पोलीस महासंचालक (विशेष कृती), महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र. पोमसं/२१-अ/१९५/रोख बक्षिस-अधिकार/१६६/२०१९, दि. ११/१२/२०१९.

**प्रस्तावाना-**

गडचिरोली, गोंदिया, चंद्रपूर, नांदेड, यवतमाळ व भंडारा या जिल्ह्यातील नक्षलवाद्यांची माहिती देणाऱ्या व्यक्तींना शासन निर्णय दि. २४/११/२००६ अन्वये रोख बक्षीसे देण्याबाबत नियम अंमलात आले आहेत. दि. ८/८/२०१४ रोजीच्या शासन निर्णयान्वये सदर देय असलेल्या रोख रक्कमेत वाढ करण्यात आली आहे. तसेच सदरहू खबऱ्यांना रोख बक्षिस मंजूर करण्याचे अधिकार पोलीस अधीक्षक, पोलीस उप महानिरीक्षक, अपर पोलीस महासंचालक (विशेष कृती), महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना देय मर्यादा निश्चित करुन प्रदान करण्यात आले आहेत.

नक्षलग्रस्त जिल्ह्यांसह राज्यातील इतर जिल्ह्यांमध्ये तसेच शहरी भागातील नक्षल संघटनांची व नक्षलवाद्यांच्या कारवायाबाबतची माहिती देणाऱ्या व्यक्तींना रोख रक्कम मंजूर करण्याचे अधिकार प्रदान करण्यासाठी गृह विभागाच्या शासन निर्णय दि. ८/८/२०१४ मध्ये अंशत: बदल करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय-**

प्रस्तावनेत नमूद केल्यानुसार गडचिरोली, गोंदिया, चंद्रपूर, नांदेड, यवतमाळ व भंडारा या नक्षलग्रस्त जिल्ह्यांसह राज्यातील इतर जिल्ह्यांमध्ये तसेच शहरी भागातील नक्षल संघंटनांची व नक्षलवाद्यांच्या कारवायांबाबतची माहिती देणाऱ्या व्यक्तींना रोख बक्षीस देण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे. तसेच सदरहू बक्षिसाच्या रक्कमा मंजूर करण्याचे आधिकार खाली नमूद केल्याप्रमाणे असतील.:-

| अ.क्र. | पदनाम | देय रक्कम मर्यादा |
|---|---|---|
| १ | पोलीस अधीक्षक | रु. २,००,०००/- च्या वरील परंतु रु. १०,००,०००/- पर्यंत |
| २ | पोलीस उप महानिरीक्षक, गडचिरोली परिक्षेत्र, नागपूर | रु. १०,००,०००/- च्या वरील परंतु रु. २५,००,०००/- पर्यंत |

| | | |
|---|---|---|
| ३ | विशेष पोलीस महानिरीक्षक, नक्षल विरोधी अभियान, महाराष्ट्र राज्य, नागपूर (महाराष्ट्र राज्यासाठी) | रु. २५,००,०००/- च्या वरील परंतु रु. ५०,००,०००/- पर्यंत |
| ४ | अपर पोलीस महासंचालक (विशेष कृती) महाराष्ट्र राज्य, मुंबई (महाराष्ट्र राज्यासाठी) | रु. ५०,००,०००/- च्या वरील परंतु रु. १,००,००,०००/- पर्यंत |

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००५०८१२१२५४३४२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Amar Chandrakant Zaware

Digitally signed by Amar Chandrakant Zaware
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=MAHARASHTRA, 2.5.4.20=cdf8f464607b97618e17350ee53aebf0c41d091cb3635a52bc9d8ec546004adb, serialNumber=b31a8de567057e1c91d2d46b233645dce61bc1c39da26f8e6dded5d3c23e2460, cn=Amar Chandrakant Zaware
Date: 2020.05.08 12:16:42 +05'30'

**( अमर चंद्रकांत झावरे )**
कार्यासन अधिकारी, गृह विभाग.

**प्रत,**

१. मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव.
३. मा. मंत्री / मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
४. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५. सर्व अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव / सचिव, मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर.
७. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर.
८. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
९. सर्व विभागीय आयुक्त, महाराष्ट्र राज्य.
१०. अपर पोलीस महासंचालक (विशेष कृती), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
११. विशेष पोलीस महानिरीक्षक, नक्षलविरोधी अभियान, नागपूर.
१२. पोलीस उपमहानिरीक्षक, गडचिरोली परिक्षेत्र, नागपूर.
१३. सर्व पोलीस आयुक्त.
१४. सर्व जिल्हाधिकारी.
१५. सर्व पोलीस अधिक्षक.
१६. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१८. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
१९. सर्व सह/उप/अवर सचिव, कक्ष अधिकारी, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
२०. निवडनस्ती (विशा-१ब).